# आशेचे कुंभ

नाझी हत्याकांडात एका महिलेने
२,५०० मुलांना वाचवले त्याची सत्यकथा



**जेनिफर रॉय**
अनुवाद: सुजाता गोडबोले

# आशेचे कुंभ

नाझी हत्याकांडात एका महिलेने

२,५०० मुलांना वाचवले त्याची सत्यकथा



# ऑटव्हॉक, पोलंड, १९१७

आयरिनचे सगळीकडे लक्ष असायचे.

काही लोकांना इतरांपेक्षा वेगळी वागणूक मिळते हे आयरिनच्या नजरेतून सुटले नव्हते. आयरिनचे डॉक्टर वडील रुग्णांना पाहायला जाताना कधी कधी आयरिनला आपल्या सोबत घेऊन जात. ते ज्या आजारी लोकांना पहायला जात, त्यांची मुले यिडिश भाषा बोलत आणि ज्यू लोकांच्या मंदिरात जात.

इतर लोक ज्यू लोकांबाबत वाईट बोलत असत ते आयरिनच्या कानावर येत असे. तिच्या आसपास राहणारे लोक ज्यू लोकांच्या वस्तीपासून दूर राहणेच पसंत करत. आयरिन मात्र बरेच वेळा ज्यू मुलांशी खेळत असे.



“बाबा, काही लोक खरेच इतरांपेक्षा अधिक चांगले असतात का?” आयरिनने विचारले.

तिच्या वडिलांनी उत्तर दिले, “आयरिन, जगात दोन प्रकारचे लोक असतात - चांगले आणि वाईट. ते गरीब आहेत की श्रीमंत, कुठल्या वंशाचे किंवा धर्माचे आहेत याने काहीच फरक पडत नाही. ते चांगले आहेत की वाईट हेच खरे महत्त्वाचे असते.”

आयरिन केवळ ७ वर्षांची असताना तिचे वडील मरण पावले. पण त्यांचे शब्द मात्र टिकून राहिले. आयरिनच्या मनावर ते कोरले गेले होते.





“ताई, तुमच्याकडे खायला काही आहे का?” आयरिनला पाहून एका मुलाने विचारले.

“माझं बाळ आजारी आहे, तुम्ही काही मदत करू शकाल का?” एका बाईंनी अजीजीने विचारले.

“इथे किती तरी लोक गरजू आहेत, मी एकटी काय करणार?” आयरिनच्या मनात विचार आला.

पण तिच्या वडिलांनी सांगितलेली एक गोष्ट तिला आठवली. ते म्हणाले होते, “कोणी बुडत असेल, तर त्याला हात दे.”

## वॉर्सा, पोलंड १९४०

आयरिनला चांगली व्यक्ती बनायचे होते.

वॉर्सामधील गरीब कुटुंबांना मदत करण्यासाठी तिने समाजसेविकेची नोकरी पत्करली.

१९३९ साली जर्मनीने पोलंडवर हल्ला केला. जर्मनीचे अडॉल्फ हिटलर नाझी पक्षाचे प्रमुख होते. ज्यू लोक जर्मन लोकांच्या बरोबरीचे नाहीत असे त्यांचे मत होते. दुसऱ्या जागतिक युद्धाला प्रारंभ झाला होता.

“मी लोकांना रोगप्रतिबंधक लस द्यायला आले आहे,” आयरिन म्हणाली. ती वॉर्साच्या बंदिस्त वसाहतीत (घेटो) प्रवेश करत होती. १९४० सालापर्यंत जर्मनीने पोलंडमधील सुमारे ५ लाख ज्यू लोकांना शहराच्या या वसाहतीत स्थलांतर करणे भाग पाडले होते. २ चौरस मैलापेक्षा हा भाग लहान होता. या वसाहती भोवती उभारलेल्या उंच भिंतींवर काटेरी तारा आणि काचेचे तुकडे लावले होते. जर्मनीने पोलंड मधील लोकांना खोटे सांगितले होते की रोगराईपासून बचाव होण्यासाठी त्यांना या वसाहतीत प्रवेश करण्यास मनाई होती.

तेथील सैनिक म्हणाला. “आत जा. आम्हाला या भिंतीबाहेर रोगराई पसरायला नको आहे.”

प्रथम आयरिनला भीती वाटली, पण नाझी लोक ज्यू लोकांना किती वाईट वागवतात हे तिने पहिले होते. केवळ त्यांच्या धर्मामुळे या वसाहतीत अडकून पडलेल्या लोकांची तिला काळजी वाटत होती.

मुलांना इथे सर्वाधिक त्रास सहन करावा लागतो आहे. त्यांना मदत केलीच पाहिजे असे तिने ठरवले.



जुलै १९४२ पासून जर्मन सैन्याने दररोज ६००० पेक्षा अधिक ज्यू लोकांना जनावरांसाठीच्या आगगाडीच्या डब्यातून बाहेर नेण्यास सुरुवात केली. आपण कोठे जात आहोत याची लोकांना काहीच कल्पना नव्हती. आगगाडीने त्यांना ट्रेब्लिंका या ठिकाणी नेण्यात येत होते आणि तेथे नाझी त्यांना मारून टाकत होते.

आयरिनने काही विश्वासू मित्रमंडळींशी चर्चा केली.

“आपण जर खूप काळजीपूर्वक काम केले तर आपल्याला कोणाच्याही नकळत या वसाहतीत अन्न आणि औषधे पाठवता येतील.” आयरिन म्हणाली.

“ते खूप धोक्याचे असेल. नाझींनी पकडले, तर ते आपल्याला मारून टाकतील.” तिची मैत्रीण यागा पित्रोव्हस्का म्हणाली.

“तू हे काम करशील का?” आयरिनने विचारले.

“अर्थात!” तिने उत्तर दिले.

आयरिन आणि तिच्या मदतनिसांनी वसाहतीत अन्न, औषधे आणि इतर साहित्य पाठवायला सुरुवात केली. पण लवकरच त्यांचे काम अधिक तातडीचे आणि जोखमीचेही होऊ लागले.

आयरिनने कामाला सुरुवात केली.

तिला अनेक लोकांची मदत मिळाली. त्यातील एक होता अँटोनी नावाचा ट्रक ड्रायव्हर. त्याला ट्रक घेऊन वसाहतीत जाण्या-येण्याची परवानगी होती. पहिल्यांदा जेव्हा आयरिनने आणि अँटोनीने एका लहान बाळाला बाहेर आणण्याचा प्रयत्न केला, तेव्हा ते बाळ रडू लागले. गेटवरच्या जर्मन सैनिकाने त्यांना जवळजवळ पकडलेच.

त्यानंतर जेव्हा आयरिन आणखी एक बाळ घेऊन ट्रककडे आली, तेव्हा तिला आश्चर्याचा धक्का बसला. ट्रकच्या पुढील सीटवर एक मोठा कुत्रा बसला होता!

“हिचं नाव शेपसी. ही फार हुशार आहे आणि सांगितलेलं ऐकते. आता ट्रकच्या मागल्या बाजूला बाळ रडले तरी आपल्याला काळजी नको.” त्याने हळूच सांगितले.



ट्रक गेटपाशी येऊन थांबली.

ट्रकच्या मागच्या भागातील बाळ जोरजोरात रडू लागले. पहारेकरी सैनिक जवळ आला.

“बापरे! आता ते आपल्याला पकडणार!” आयरिनच्या मनात विचार आला.

तेवढ्यात अँटोनीने शेपसीच्या पंजावर हळूच थोपटले. शेपसी जोरात भुंकू लागली. ते ऐकून पहारेकऱ्याची कुत्री देखील भुंकू लागली. त्या सर्व आवाजात बाळाचे रडणे कोणाला ऐकू आले नाही आणि ट्रक सुखरूप वसाहतीबाहेर पडला.



## १८ जुलै १९४२

आयरिनने एका दारावर टकटक केले.

दार उघडल्यावर तिने एक मोठा श्वास घेतला आणि घरात प्रवेश केला. “आता वेळ झाली आहे.” ती म्हणाली.

हेनिया कोपेलने आपली तान्ही मुलगी आयरिनने आणलेल्या सुताराची हत्यारे ठेवण्याच्या पेटीत अलगद ठेवली. आयरिनने बेबी बिएटाच्या निरागस चेहऱ्याकडे पाहिले. शालीत गुंडाळलेल्या बाळाची हालचाल चालली होती. बाळ हळूच हसले. आयरिनने बाळाच्या तोंडात औषधाचे २-३ थेंब टाकले. म्हणजे बिएटाला छान झोप लागेल. तिने शाल नीट गुंडाळली, आणि हवा येण्यासाठी पेटीला केलेली भोके नीट मोकळी आहेत ना याची परत एकदा खात्री करून घेतली.

आयरिन आता पेटी बंद करणार होती, इतक्यात बाळाच्या आजोबांनी काहीतरी हळूच पेटीत ठेवले. तो एक चांदीचा लहानसा चमचा होता, त्यावर बाळाचे नाव आणि जन्मतारीख कोरलेली होती- एलिझाबेथ, ५ जानेवारी १९४२.

“आई-बाबांकडून एक छोटीशी भेट,” ते डोळे पुसत म्हणाले.

आयरिनने परत एक मोठा श्वास घेतला आणि ही अमूल्य पेटी हातात घेऊन ती घराबाहेर पडली.







आयरिनने आणखी काही दारे वाजवली.

“कृपा करून तुमचे बाळ माझ्याकडे द्या. मी त्याला वाचवण्याचा शक्य तेवढा सर्व प्रयत्न करेन.” तिने विनवणी केली.

“आमचे बाळ वाचेल याची काय खात्री?” आई-वडील विचारत.

“इथेच राहिले तर तुमचे बाळ वाचू शकणार नाही, एवढेच मी खात्रीने सांगू शकते.” आयरिनने उत्तर दिले.

जेव्हा आई-वडील बाळ तिच्याकडे देण्यास तयार होत, तेव्हा या बाळाला कसे वाचवायचे याचा निर्णय आयरिनला घ्यावा लागे.

आयरिन तान्हया बाळांच्या आई-वडिलांना सांगत असे, “तुमचे बाळ छोटे आहे. आम्ही त्याला लपवून बाहेर नेऊ...

बटाट्याच्या पोत्यातून, एखाद्या शवपेटीतून नाहीतर कचऱ्याच्या गाडीच्या खालच्या भागात लपवून...”





जी मुले थोडी मोठी होती, त्यांना ती समजावून सांगत असे.

“आता धीट हो. या क्षणापासून तुझे नाव आयझॅक नाही. ते आहे पीटर. तू पीटर आहेस असे तुलाच खरे वाटेपर्यंत ते नाव परत परत म्हणत रहा. त्यानंतर लगेच येशूची प्रार्थना पाठ कर. आता तू एक कॅथॉलिक आहेस हे लक्षात ठेव.”

पीटरने प्रार्थना पाठ केली आणि त्याचबरोबर क्रुसाची खूण करायलाही तो शिकला.

“छान! आता तुझी तयारी झाली आहे. आता माझ्यामागे ये.” आयरिन म्हणाली.

वसाहतीच्या सीमेवरच्या न्यायालयात मग ते घाईघाईने गेले. आयरिनने पीटरला त्याचे कपडे बदलून नवे कपडे घालायला दिले आणि ते मागच्या दाराने वसाहती बाहेर पडले.

इतर वेळी आयरिनचे मदतनीस भूमिगत राहून काम करायचे. जमिनीखाली असलेल्या सांडपाण्याच्या चरांच्या जाळ्यातून ते शिताफीने ज्यू मुलांना सुरक्षितपणे बाहेर काढायचे.



# नोव्हेंबर, १९४२

आयरिन झेगोटाची सदस्य झाली.

झेगोटा हा पोलंडमधील शूर लोकांचा एक गट होता. ज्यू लोकांना वाचवण्यासाठी ते मदत करत असत. आयरिन ज्यू मुलांना वाचवणाऱ्या गटाची प्रमुख होती. ती आणि तिचे मदतनीस दररोज ज्यू वसाहतीतील मुलांना लपून छपून बाहेर काढत असत. पण मग ही मुले कुठे जात?

अनेक साहसी आणि धीट लोकांनी या मुलांना आपल्या कुटुंबात सामावून घेतले. काही कुटुंबांनी लहान बाळांचे पालकत्व स्वीकारले. काही मुलांना पोलंडमधील अनाथालयात पाठवण्यात आले. काही मुले ख्रिस्ती लोकांच्या मठात गेली आणि तेथील भिक्षुणींनी त्यांचे पालनपोषण केले.





आपण ज्यू मुलाला लपवले आहे असे समजले तर आपल्याला मृत्युदंड होईल याची सर्वांना चांगली कल्पना होती. परंतु या लोकांनी ज्यू मुलांना वाचवण्यासाठी आपले प्राण पणाला लावले होते. आपण करत आहोत ते योग्य आहे अशी त्यांची खात्री पटली होती.



आयरिनने सर्व नोंदी ठेवल्या होत्या.

आयरिन आणि तिच्या मदतनिसांनी केवळ मुलांना वाचवले इतकेच नव्हे, तर प्रत्येक मूल सुरक्षित असेल आणि त्याची चांगली काळजी घेतली जाईल याकडेही त्यांनी लक्ष दिले. आयरिन आणि तिच्या मदतनिसांनी पैसे, अन्नधान्य, इतर साहित्य अशी मदतही या काळजीवाहू कुटुंबांपर्यंत पोचवली.



"आता या मुलांची चांगली काळजी घेतली जात आहे," आयरिनने यागा या आपल्या मैत्रिणीला सांगितले. "परंतु, युद्ध संपल्यावर त्यांना त्यांच्या आई-वडिलांकडे परत पाठवावे लागेल. मुलांच्या खऱ्या नावांची आणि त्यांच्या आताच्या नावांची आणि आता ती कोठे आहेत याची मी यादी करून ठेवली आहे."

"मी देखील अशी यादी बनवली आहे." यागा म्हणाली. "या याद्या जर नाझींच्या हाती लागल्या, तर ते आपल्याला तर मारून टाकतील, शिवाय या मुलांना आणि त्यांची काळजी घेणाऱ्या कुटुंबांनाही शोधून काढतील आणि ठार करतील."

"प्रत्येक मुलाला आपले खरे नाव समजायलाच हवे," आयरिनने आग्रहाने म्हटले. "शिवाय या मुलांच्या कुटुंबांनाही त्यांना शोधावेसे वाटेल. पण तू म्हणतेस ते ही खरे आहे... हे सर्व धोकादायक आहे आणि आपल्याला खूप काळजी घ्यावी लागेल."



# आयरिनची सदनिका

## २० ऑक्टोबर १९४३

आयरिन पकडली गेली.

मुलांना वाचवण्यात मोठा धोका आहे हे तिला माहित होतेच. तिची सर्वात मोठी भीती आता खरी ठरण्याच्या मार्गावर होती.

धड! धड! धड!

“दार उघड!” दाराला धक्के देत एक माणूस ओरडला.

“हे गेस्टापो (नाझींचे गुप्त पोलीस) आहेत,” आयरिन हळूच म्हणाली.

आयरिनने तिच्याकडील याद्या उचलल्या आणि त्या बाहेर फेकण्यासाठी ती खिडकीजवळ गेली. पण खिडकीखाली तर आणखी बरेच गुप्त पोलीस वाट पाहत उभे होते.

त्यांनी संपूर्ण इमारतीला वेढा घातला होता.

धड! धड!

हताश होऊन आयरिनने त्या याद्या तिच्यासोबत सदनिकेत राहणाऱ्या जेनिना या तिच्या मैत्रिणीकडे फेकल्या. तिने त्या याद्या आपल्या कपड्यांच्या आत काखेत लपवल्या. मग आयरिनने दार उघडले.



गुप्त पोलीस तिच्या खोलीत घुसले. तिच्या घराची आणि सामानसुमानाची त्यांनी झडती घेतली. पण त्यांना याद्या सापडल्या नाहीत.

तरीही ते आयरिनला आपल्या सोबत घेऊन गेले.

## पाविक तुरुंग, ऑक्टोबर १९४३

आयरिनला तुरुंगात टाकण्यात आले.

जे कोणी नाझींचा कायदा मोडतील, त्यांची नाझी गुप्त पोलीस या तुरुंगात उलटतपासणी घेत असत.

“झेगोटा बद्दल तुला काय माहित आहे ते सर्व आम्हाला सांग.” नाझी पोलिसाने फर्मावले.

“मला त्याबद्दल काहीच माहित नाही. मी फक्त एक समाजसेविका आहे,” आयरिनने उत्तर दिले.



त्या पोलिसाने आयरिनच्या पायावर प्रथम चाबकाने आणि नंतर पट्ट्याने फटके मारले.

परंतु आयरिनने आपले तोंड उघडले नाही.

आयरिनचा रोजचा दिनक्रम एकसारखाच होता.

तुरुंगात दिवसातील १२ तास तिला धुणे धुवावे लागे. त्यानंतर झेगोटा मधील तिच्या साथीदारांची नावे सांगावीत म्हणून तिची कसून उलटतपासणी घेतली जाई आणि तिला मारहाण केली जाई. तिला पुरेसे अन्नही देण्यात येत नसे. भूक आणि वेदना यामुळे तिला रात्री चांगली झोपही येत नसे. असेच ३ महिने निघून गेले.



## पाविक तुरुंग,जानेवारी १९४४

आयरिनचे नाव पुकारण्यात आले.

“आयरिन सॅन्डलर!” एक पहारेकरी खेकसला.

अगोदरच अनेक स्त्रिया असलेल्या एका ट्रकमध्ये तिला ढकलून देण्यात आले.

त्यांना नाझी गुप्त पोलिसांच्या मुख्यालयात नेण्यात आले.

“आता बहुधा आपल्याला मारून टाकतील,” आयरिनच्या मनात विचार आला, “मी त्यांना काहीही माहिती दिली नाही याचा मला अभिमान वाटतो. मरणाची मला मुळीच भीती वाटत नाही.”

आयरिनला एका खोलीत ढकलण्यात आले तेव्हा ती गुडघ्यावर पडली.

एका अधिकाऱ्याने तिला ओढत ओढत एका खोलीत नेले.

“आता तुला मुक्त करण्यात आले आहे. आता ताबडतोब इथून निघून जा.” तो अधिकारी पोलिश भाषेत म्हणाला.



आपल्या जखमी पायांवर लंगडत आणि धडपडत आयरिन एका गल्लीत आली. ढगांमागून अचानक सूर्य बाहेर आला. क्षणभर तिला काहीच दिसेना. १०० दिवसात तिने सूर्यप्रकाश पहिला नव्हता.

आयरिन लपून राहिली.

तिला मुक्त करण्यासाठी झेगोटाने त्या अधिकाऱ्याला बरेच पैसे दिले होते. आणि ती मरण पावली आहे असे नाझींना वाटत असल्याने तिला लपून राहणे भाग होते.

आयरिन आपल्या मित्रमंडळींच्या घरात लपत असे. काही दिवस तर ती वॉर्साच्या प्राणिसंग्रहालयात लपून राहिली होती. त्यावेळी ती कोल्ह्याच्या पिल्लांसोबत त्यांच्या पिंजऱ्यात झोपत असे. परंतु तिचे झेगोटा सोबतचे काम अव्याहत चालू होते. आणि तिने तयार केलेल्या वाचवलेल्या मुलांच्या याद्या अजूनही सुरक्षित होत्या.





## १९४४ चा उन्हाळा संपता-संपता

आयरिनने आपल्या याद्या लपवून ठेवल्या होत्या.

वॉर्साच्या उठावांना सुरुवात झाली होती. रस्त्यात देखील लढाया होत होत्या. आपल्याला जरी काही झाले तरीही आपल्या याद्या सुरक्षित राहतील याची आयरिनला खात्री करून घ्यायची होती.

एक दिवस मध्यरात्री यागा आणि आयरिन लपत छपत यागाच्या घरामागच्या अंगणात आल्या. दोघींनी मिळून एक सुरी आणि चमचा घेऊन एक लहानसा खड्डा खणला. याद्या ठेवलेल्या ३ बरण्या त्यांनी या लहानशा खड्यात पुरल्या आणि वरून माती टाकून खड्डा बुजवून टाकला. याद्या आता सुरक्षित होत्या. नावे असलेल्या बरण्या. त्यात मोठीच आशा दडलेली होती.

# त्यानंतर

युद्ध संपल्यानंतर वाचलेल्या लोकांची आपल्या कुटुंबांशी भेट करून देण्याच्या कामात सहभागी असलेल्या एका संस्थेकडे आयरिनच्या याद्या सुपूर्द करण्यात आल्या. दुर्दैवाने अनेक मुलांचे आई-वडील मृत्युमुखी पडले होते. परंतु काही थोडे वाचले होते आणि आयरिनच्या याद्यांमुळे त्यांची आपल्या मुलांशी भेट होऊ शकली.

काही मुलांना त्यांचा खरा इतिहास आणि त्यांना वाचवण्यासाठी त्यांच्या आई-वडिलांनी घेतलेला धीराचा निर्णय समजला. काहींना अद्यापही त्यांना वाचवणाऱ्या शूर आणि सहृदय आयरिनची देखील आठवण होती.

अनेक वर्षे उलटून गेल्यावर देखील लोक विचारीत, "आयरिन, तू हे सर्व कशासाठी केलेस? ज्यू मुलांना वाचवण्यासाठी तू तुझा जीव का धोक्यात घातलास?"

आयरिनचे उत्तर होते, "जर्मनीच्या अधिपत्याखाली पोलंडचा ऱ्हास होत असलेला मला दिसत होता. ज्यू लोकांची परिस्थिती अत्यंत वाईट होती. आणि त्यात देखील मुलांना सर्वाधिक मदतीची गरज होती. म्हणून मला त्यांना मदत करायची होती."

१२ मे २००८ रोजी आयरिन तिची मैत्रीण एलिझाबेथ सोबत नाश्ता करत होती. जी तान्ही असताना सुताराच्या अवजारांच्या पेटीतून बाहेर गेली होती, तीच ही एलिझाबेथ होती. आता मोठ्या असलेल्या एलिझाबेथचे आई-वडील युद्धात मारले गेले होते, पण त्यांची आठवण म्हणून तो चांदीचा चमचा अद्यापही तिच्याकडे होता. आयरिन आता ९८ वर्षांची होती. आज ती प्रसन्न मनस्थितीत होती आणि या दोन मैत्रिणी गप्पा मारत होत्या. अचानक आयरिनने डोळे मिटले आणि शांतपणे प्राण सोडला.

नाझी हत्याकांडातील ज्यू लोकांची आठवण म्हणून इस्राईलने ठेवलेल्या 'याड वाशेम' या पुरस्काराने तिचा सन्मान करण्यात आला. तिला जे पदक देण्यात आले, त्यावर कोरले होते,

"जे कोणी एक जीव वाचवतात, ते सर्व विश्व् वाचवतात."

आपण काही फार मोठे काम केले आहे असे आयरिनला कधीच वाटत नसे.

ती म्हणायची, "सर्वप्रथम हे सांगितले पाहिजे की मला अनेक मदतनीस होते. त्यांना कोणी कधीच विसरू नये. ही काही मोठी शौर्याची गोष्ट नव्हती. माझ्या काळजाची ती एक साधी, नैसर्गिक गरज होती."

# लेखिकेचे मनोगत

१९९९ साली कॅन्सस राज्यातील युनियन टाऊन शहरातील एका नववीतील मुलीने आयरिन सॅन्डलर नावाच्या एका पोलंडमधील महिलेविषयीचा वर्तमानपत्रातील एक लेख वाचला. आयरिन यांनी २,५०० मुले नाझींच्या काळात वाचवली होती.

"मी त्यांच्याबद्दल यापूर्वी कधीच कसे ऐकले नाही!" एलिझाबेथच्या मनात विचार आला.

तिने आजूबाजूला चौकशी केली. आयरिन सॅन्डलर बाबत कोणाला काहीच माहित नव्हते. श्रीयुत कोनार्ड या त्यांच्या शिक्षकांच्या मदतीने एलिझाबेथने आणि मेगन स्टुअर्ट व सब्रीना कून्स या तिच्या मैत्रिणींनी आयरिनच्या ऐतिहासिक कामगिरीबाबत एक लहानसे नाटक सादर केले.

एलिझाबेथ, मेगन आणि सब्रीना यांना या नाटकाबद्दल पारितोषिक मिळाले. इतरही अनेक विद्यार्थी आयरिनच्या शौर्याची कहाणी सांगण्यासाठी त्यांच्याबरोबर नाटकात भाग घेऊ लागले.

एलिझाबेथ, मेगन आणि सब्रीना आयरिन सॅन्डलरना भेटण्यासाठी मुद्दाम पोलंडला गेल्या. आयरिन जरी आता वयस्कर असल्या, तरी त्यांच्या डोळ्यात पूर्वीचीच चमक होती आणि हृदयात मुलांविषयीचे प्रेम.

नाझी हत्याकांड म्हणजे केवळ इतिहासाच्या पुस्तकात वाचण्याची हकीकत नव्हती, तर ते सत्य होते आणि अनेकांनी त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला होता याचे आयरिन या जिते-जागते उदाहरण होत्या.

अगदी माझ्या सिल्व्हिया आत्याप्रमाणे.

माझ्या आत्याने जेव्हा तिच्या लहानपणची पोलंडमधील लोड्झ गावातील ज्यू वसाहतीची हकीकत सांगितली तेव्हा माझ्या मनात विचार आला की, "आतापर्यंत कोणी याबद्दल काही कसे ऐकले नाही?" कॅन्ससमधील या शाळकरी मुलींप्रमाणे मलाही ही अविश्वसनीय गोष्ट जगाला सांगायची होती. म्हणून मी 'यलो स्टार' नावाचे पुस्तक लिहिले.

लहानगी सिल्व्हिया (म्हणजेच माझी सिल्व्हिया आत्या) आयरिन सॅन्डलर यांच्यापासून सुमारे ८० मैल अंतरावरील ज्यू वसाहतीत राहत होती. त्या दोघींच्या हकीकती अगदी निराळ्या आहेत. परंतु अत्यंत निराशाजनक काळातही दोघींच्या हृदयात एक गोष्ट मात्र समान होती.

ती म्हणजे **आशा**.

जेनिफर रॉय

१२ ऑगस्ट, २०१४.